**महाराष्ट्र विकास सेवा गट -अ , अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) व अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी/प्रकल्प संचालक संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्या.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
शासन आदेश क्रमांक : मविसे-१०२३/प्र.क्र.८८/२०२३/आस्था-३,
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
दिनांक:-१७ जुलै, २०२३

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम , २००५ मधील तरतूदींनुसार बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४(१), ४(२) व ४(३) मधील तरतूदींनुसार नागरी सेवा मंडळाची शिफारस तसेच बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने महाराष्ट्र विकास सेवा गट -अ, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) व अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी/प्रकल्प संचालक संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्यांचे शासन आदेश देत आहे. संबंधित अधिकाऱी यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्रीम.एस.जी.पाटील,<br>प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.छत्रपती संभाजीनगर | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.बीड | रिक्तपदी |
| २. | श्री.अशोक सिरसे,<br>अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (नियुक्तीशिवाय) | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.छत्रपती संभाजीनगर | रिक्तपदी |

२. (१) श्री.अजय कुमार सतिशराव माने, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर व (२) श्री.जी.डी.भालेराव, उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण या अधिकाऱ्यांना सध्याच्या कार्यरत पदावर १ वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. संबंधित अधिकारी यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा . तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास , ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

४. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पदस्थापना झालेल्या अधिकाऱी यांना त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे .

५. संबंधित अधिकारी यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. संबंधित अधिकारी विहित कालावधीत पदस्थापना झालेल्या पदावर रूजू न झाल्यास, उक्त अधिकाऱ्याविरुध्द संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७१७११२२२३६१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, pseudonym=04E059BEAE068888E7BA44450EA675CB2621C0EB, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2023.07.17 17:14:28 +05'30'

**( उर्मिला जोशी )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

२) मा. उपमुख्यमंत्री ,महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई,

३) मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक,

५) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर ,पुणे व कोकण,

६) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर

७) मुख्य कार्यकारी अधिकारी, छत्रपती संभाजीनगर, बीड व कोल्हापूर,

८) जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर, बीड, कोल्हापूर व नवी मुंबई,

९) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.),

१०) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास विभाग, मुंबई,

११) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास विभाग, मुंबई.